**राज्य योजना सन २०२२-२३**
**निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०५.२२/प्र.क्र.१४६/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ३०/३१५/२०२२-२३, दिनांक १६.०९.२०२२.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-२२ (६)/ यो/ प्र.क्र. २७/२५९७/२०२२-२३, दिनांक १४.१२.२०२२.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ३०/६६४/२०२२-२३, दिनांक २५.०१.२०२३.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ३०/६७५/२०२२-२३, दिनांक ३०.०१.२०२३.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ३०/६७५/२०२२-२३, दिनांक १४.०२.२०२३.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ३०/८६२/२०२२-२३, दिनांक १४.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ आर्थिक वर्षाकरिता निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ५३६०.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ ला अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

३. संदर्भ क्रमांक २ ते ७ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ करीता प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (कार्यक्रम) (२४०६ ०७७५) या योजनेतंर्गत रू. ६६१६.७३१ लक्षचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केले आहेत. त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ परिपत्रक विचारात घेता प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर व प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २, ४, ६ व ७ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन निसर्ग संरक्षण व वन्यपशु व्यवस्थापन (२४०६-०७७५) या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्प निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत **रु. १८५३.८७ लक्ष** इतका निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

i. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन, ११० - वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

ii. संदर्भ क्रमांक २, ४, ६ व ७ च्या पत्रामध्ये नमूद कार्यबाबींचा सदर योजनेमध्ये समावेश होत असल्याची खातरजमा करुन प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निधी वितरीत करावा.

iii. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची करण्यात यावा.

iv. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

v. वित्त विभागाने साहित्य व इतर खरेदीच्या अनुषंगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसार कार्यवाही करुन प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निधी वितरीत करावा.

vi. कामांची अंमलबजावणी करताना कामांचे एकत्रीकरण करुन नियमानुसार ई-निविदा प्रणाली अवलंबण्याची दक्षता घ्यावी.

vii. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१६०४४२३९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.03.16 16:09:11 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर / पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचलाक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), गडचिरोली/पुणे/कोल्हापूर.
७. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
८. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
१०. उपवनसंरक्षक (वन्यजीव), पुणे/औरंगाबाद.
११. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर /सावंतवाडी / ब्रम्हपूरी / पुणे
१२. उपसंचालक (कोर/बफर), ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपुर.
१३. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१४. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********

शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी ०५.२२/प्र.क्र. १४६/फ-, दिनांक :- १६ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र.

**(रक्कम रु. लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | प्रस्तावाची रक्कम | प्रस्तावातील वगळलेली बाब क्रमांक | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | बोर व्याघ्र प्रकल्प | १११.३६ | अ.क्र. १०, ११, १२ | १००.०० |
| २ | उमरेड-पवनी-कऱ्हांडला अभयारण्य | २७५.०२ | -- | १००.०० |
| ३ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे | ३३५.७५ | -- | १००.०० |
| ४ | उपवनसंरक्षक, ब्रम्हपुरी वनविभाग | ८११.४८० | -- | ३२५.०० |
| ५ | उपसंचालक (बफर), ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपुर | ३०.६६० | अ.क्र. १ ते ३ व ५ ते ७ | २.४३ |
| ६ | उपसंचालक (कोर), ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपुर | ७०९.६४० | अ.क्र. ७९ ते ८४ | ३००.०० |
| ७ | मेळघाट व्याघ्र प्रकल्प | ७७६.१६ | -- | २००.०० |
| ८ | वनसंरक्षक (प्रादेशिक),गडचिरोली | १९५.०० | -- | ७०.०० |
| ९ | उपवनसंरक्षक (वन्यजीव),पुणे. | १५३.०० | -- | ६०.०० |
| १० | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), सावंतवाडी | ५०.२८ | -- | ५०.२८ |
| ११ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर. | २६.१६ | -- | २६.१६ |
| १२ | उपसंचालक (बफर), ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपुर | १४९०.५४ | अ.क्र. ३३७ ते ३७५ | ५२०.०० |
| | **एकूण** | **४९६५.०५** | | **१८५३.८७** |

*******